दि.११ डिसेंबर, १९९८ रोजी शासकीय कर्मचा-यांच्या संपात
भाग घेवून अनुपस्थित राहिलेल्या कर्मचा-याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : एसटीके-१०९८/२०९९/प्र.क्र.४०/९८/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ ऑक्टोबर, १९९९,

वाचा :- शासन परिपत्रक, क्रमांक : एसटीके-१०९८/२०९९/प्र.क्र.४०/९८/१६-अ,
दिनांक ९ डिसेंबर, १९९८.

**शासन निर्णय :-**

शासकीय कर्मचा-यांच्या प्रलंबित मागण्यांकडे शासनाचे लक्ष वेधण्यासाठी आयोजित केलेल्या देशव्यापी संपात महाराष्ट्र शासनाचे अधिकारी/कर्मचारी दि.११ डिसेंबर,१९९८ रोजी एक दिवसाच्या लाक्षणिक संपावर गेले होते. सदर संपात भाग घेवून जे शासकीय अधिकारी/कर्मचारी कामावर अनुपस्थित होते त्यांची अनुपस्थिती कशी नियमित करावी, असा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. यासंबंधात शासन आता असे आदेश देत आहे की, दि.११ डिसेंबर, ९८ रोजी अनुपस्थित राहिलेल्या अधिकारी/कर्मचा-यांचा अनुपस्थितीचा कालावधी, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ च्या नियन ६३ प्रमाणे असाधारण रजा (विनावेतन, विना भत्ते) देवून नियमित करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(श्रीमती शैला तारगे पाटील)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त आणि उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, मुंबई,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर,
**महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,**

मंत्रालयातील सर्व विभाग,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त /सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई / सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व इतर विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
xxxxxxxxxxxxxxxx
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

**पत्राने.**